ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति अन्य शक्तींस सांगत । कामासुर जाई विकटाप्रत । त्यास म्हणे भयसंयुक्त । हितकारक वचन ऐसें ।।१।। विकटा तूं प्राज्ञा ब्रह्म साक्षात । तुज नसावा पक्षपात मनांत । परी सुर असुरांतून दोघांत । सुरांचा पक्ष कां घेसी ।।२।। तूं विकट ब्रह्म वेदांत । जरी जन्मादिहीन भावें वर्णित । तरी कैसा देहधारक दिसत । हें सर्व रहस्य सांग मजला ।।३।। तुज यथार्थ जाणून । तरीच येईन तुज शरण । नाथा येईन प्रसन्नमन । अन्यथा नाहीं नमणार ।।४।। विकट

तेव्हां त्यास सांगत । माया नाना विध असत । मी त्या मायेस धारण करित । क्रीडा करितों बहु प्रकारें ।।५।। तिच्या आधारें भेद करून। मज मयूरेश अभिधान । माया शब्द मयूरनिदर्शन । करी ऐसें वदति तत्त्वज्ञ ।।६।। त्या मायेचा स्वामी जगांत । मयूरेश ऐसें जाण मनांत । नानाभेदमय जें ब्रह्म वर्तत । त्यास असद्रूप बुध म्हणती ।।७।। उत्पत्तिस्थितिसंहारयुक्त । असद्ब्रह्म प्रदर्शित । परी अमृतमय ब्रह्म वर्तत । भेदविवर्जित सर्वकाळ ।।८।। तेंच विकट सत्यत्वें असत । तोच मी गजानन तुझ्या पुढयांत । सदा अखंडमय जें ज्ञात । त्यास जन्ममृत्यू भय कैसे।।९।। तें साक्षिरूप ब्रह्म ख्यात । चारविहीन चारयुक्त । अमृतसंज्ञ विकट उदात्त । भेदाभेदातीत तें ।।१०।। सर्वांचें जीवनाधार ब्रह्म । विकट तेचि परम । त्यास भज तूं निष्काम । मृत्युहीन तरी होशील ।।११।। सिद्धि भ्रांतिकर्ती ज्ञात । बुद्धि ती भ्रांतिधारक असत । त्यांचा स्वामी गणेश उदात्त । विचार करी हा हृदयांत ।१२।। दैत्या पंचविध चित्त । पंचधा भ्रांति वर्तत । भ्रांतियुक्त महाचित्त । त्याग त्याचा करी तूं ।।१३।। चिंतामणीसी तू भजावें । सर्वाच्या चित्तांत बरवें । स्थान माझें जाणावें । मत्प्रीत्यर्थ प्रयत्न करी ।।१४।। महामते मीं देहधारी होउन । भक्तांस शांति देत महान । माया माझी ही जाण । संप्रज्ञात नराकार मीं ।।१५।। असंप्रज्ञात्मक शिर असत । त्यांच्या योगे देहधारी गज होत । म्हणून गजवक्त्र मी दिसत । व्यावहारिक जनांसी ।।१६।। परी योगिजनांस मीं वर्तत । स्वसंवेद्य स्वानंदवासविराजित । मायाक्रीडार्थ रचित । आनंदरूप मी विविधवर्ण ।।१७।। विश्व स्वधर्मयुक्त । त्यांत मीं नित्य राही चित्तांत । देव असुर सारे माझ्यात । सामावले भिन्न न कांहीं ।।१८।। परी धर्मरक्षणार्थ वधित । सर्वांसी मी संशयरहित । स्वर्गांत देवांसी स्थापित । नरांसी या पृथ्वीवरी

।।१९।। असुरांस पाताळ विवरांत । स्थान त्रिविध विश्वांत । जेव्हां देव लोभयुक्त होत । असुरांवरी हल्ला करिती ।।२०।। महा असुरांसी मारण्या उद्युक्त । विष्णुप्रमुख देव लोभें होत । उत्सुक ते क्रोधयुक्त। तेव्हां मी प्रेरक दैत्यांसी ।।२१।। त्यांच्या ह्रदयांत विराजत । त्यांना तपाची प्रेरणा देत। त्यायोगें करी सामर्थ्ययुत । देवांसवें लढण्यासी ।।२२।। त्यासमयीं मी विघ्न आणित । देवसंघाच्या मार्गांत । दैत्यांचें विघ्न हरण करित । विघ्नकर्ता विघ्नहर्ता मीच ।।२३।। त्यायोगें दैत्येंद्रांचा जय होत । देव होती पराजित । असुर जेव्हां त्यांसी ताडित। तेव्हां वनवासी ते होती ।।२४।। माझ्या इच्छेनें हें न घडत । देवांची कर्मे त्यांस नडत । तैसेचि दैत्य होतां मदयुक्त । कर्मनाश करिती ते ।।२५।। देवांचे मूळ उच्छेदिती । महादुष्ट असुर पीडिती । सरळ सात्त्विक जनांसी जगतीं । तेव्हां देवपक्षपाती मी ।।२६।। देवांस बलशाली करित । ते दैत्य नायकांसी वधित । दैत्यांचीं छिद्रें दाखवित। देवांच्या ह्रदयीं प्रवेशून ।।२७।। ब्रह्मादि देवांस अजिंक्य होत । दैत्य जेव्हां मदोन्मत्त । त्यांचा वध करण्या न शक्त । तेव्हां देह मीं धारण करी ।।२८।। असुरांचें करी हनन क्षणांत । ऐसें रहस्य जाण तूं मनात। जेव्हां देवदैत्य उभय वर्तत । स्वधर्मानें स्वनीतीनें ।।२९।। तेव्हां त्यांच्या ह्रदयात । सर्वांच्या मी विलसत । सर्व विश्व सौख्यें नांदत । मीं न पीडी कोणासही ।।३०।। अरे धर्मलोपका तूं पीडिलेंस । बळदर्पें समस्त देवगणांस । वरप्रभावें माजलास । म्हणून देवपक्षपाती मीं ।।३१।। आलों तुजला मारण्यास । महादुष्टा जरी न नमलास । माझा अवमान करण्यास । प्रयत्न जरी तूं करिशी ।।३२।। तरी मी तुझें करीन हनन। परी वैर जरी देशील सोडून । देवांचें तरी तुज जीवन । वरदान रूपें देईन मीं ।।३३।। ऐसें बोलून विकट थांबत । तेव्हां कामासुर चित्तांत।

प्रसन्नपणे विचार करित । भक्तिगौरव मनीं आणी ।।३४।। म्हणे हा विकट संशयातीत । सुरासुरांचा आधार सतत । हा पूर्ण ब्रह्म साक्षात। यास शरण मी जाईन ।।३५।। कामासुर ऐसा विचार करित । निश्चय करूनियां मनांत । आपुलें शस्त्रादिक टाकून देत । दोन्ही कर जोडी विकटापुढें ।।३६।। प्रणाम करी तयास । हर्षभरित चित्तें पूजनास । करूनिया विघ्नपास । संतोषवी तो स्तवन करुनी ।।३७।। कामासुर स्तोत्र गात । विकटा गणेशा नमन तुजप्रत । परमात्म्या सर्वपूज्या मी विनत । सर्वेशा तुज अभिवादन ।।३८।। देवासुरमयासी । अनंत मायायुक्तासी । ब्रह्मभूतस्वरूपासी । गजानना तुज नमन असो ।।३९।। हेरंबासी देवेशासी । शूर्पकर्णासी विघ्नचालकासी । भक्तांचे विघ्नहर्त्यासी। अभक्तविनाशका तुज नमन ।।४०।। स्वानंदवासीसी योगाकारस्वरूपासी । योग्यांसी शांतिदात्यासी । योगेशासी अनामयासी । सर्वादिपूज्या तुला नमन ।।४१।। ज्येष्ठरूपासी ज्येष्ठांस पददात्यासी । ज्येष्ठ राजासी गणपतीसी । सिद्धिबुद्धिप्रदात्यासी । सिद्धिबुद्धिविहारा तुज नमन ।।४२।। सिद्धिबुद्धिस्वरूपासी । त्रिनेत्रासी चतुर्बाहु धरासी । लंबोदरासी ब्रह्मेशासी । ब्रह्मपतीसी नमन असो ।।४३।। देवांच्या पालकासी । दैत्यांसी वरदात्यासी । सर्वासी समभावासी । ढुंढिराजा तुला नमन ।।४४।। विष्णुपुत्रासी शंभूसी । शक्तिपुत्रासी काश्यपासी। वरेण्यसुता सर्वांच्या मातापित्यासी । किती स्तवूं मीं तुजला ।।४५।। योगींद्रमुख्य जेथ थकले । वेदादीही मूक झाले । तेथ माझें काय चाले। मंदबुद्धी मीं काय स्तवूं ।।४६।। मायासुख भ्रांतिप्रद । विशेषें भुलवी जें सौख्यद । प्राणिमात्र सोडितां तें मोहद । भक्तीनें दृढ तुज प्राप्त करी ।।४७।। अशांत मायेनें युक्त । सदा चित्त भ्रांतियुत । विकटांत शांति पावत । म्हणून विकट नांव तुझें ।।४८।। ऐसी स्तुति तो कामासुर

करित। तैं रोमांच अंगावरी उठत । तो भावभक्तीनें नाचत । कंठ त्याचा रुद्ध झाला ।।४९।। त्याचें मन भक्तियुक्त । पाहून विकट त्यास म्हणत। वर माग कामासुरा मी तुष्ट । सारें मनोवांच्छित पुरवीन ।।५०।। मी येथ क्रोधयुक्त । आलों वध करण्या तुझा निश्चित । परी आतां तूं शरणागत । म्हणोनि तुज न मारीन ।।५१।। तूं केलेलें हें स्तोत्र असत। अत्यंत प्रियतम मजप्रत । सर्वकामप्रद पुनीत । पाठकां वाचकां उभयतांसी ।।५२।। प्रथम ऐहिक ऐश्वर्य मिळून । अन्तीं स्वानंदलाभ महान । सुखमय होईल जीवन । ह्या स्तोत्राचे पाठ करितां ।।५३।। ऐसें गणपतीचें वाक्य ऐकून । कामासुर करी वंदन । हर्षसंयुक्त करी स्तवन । म्हणे प्रसन्न जरी तूं मजवरी ।।५४।। तरी तुझी भक्ति उत्तम । दृढ करी मच्चित्तीं अनुपम । स्थानादिक मज मनोरम । देई तेथें राहीन मीं ।।५५।। त्या जागीं निवास करून । देवा मी सतत करीन भजन । गाणपत्यप्रियत्व पावन । देई नित्य गजानना ।।५६।। याहून अन्य न मीं याचित । योगींद्रमुख्यांसही दुर्लभ जगांत । ऐसें तुझें दर्शन साक्षात । दिव्य चरण पाहिले तुझें ।।५७।। तुझे पद सुदुर्लभ असत । हें मज कळलें रहस्य अद्भुत । त्यांचें वचन ऐकून म्हणत । भक्तवत्सल विकट देव ।।५८।। गणेश कामुका कामासुरास । विकट बोले महाभक्तास । महासुरा तुझ्या चित्तास । दृढ भक्ति माझी लाभेल ।।५९।। गाणपत्यप्रिय तूं होशील । योगपरायण सदा अमल । पूर्ववत् आपुल्या स्थानीं राहशील । पीडा देई अभक्त नरांसी ।।६०।। जेथ नसे माझें स्मरण । न करिती जे नर पूजन । त्या सर्व कार्यांत कामा तू दारुण । प्रभाव दाखवी आपुला ।।६१।। तेथ आसुरस्वभावें । तूं सारें कर्मफळ भोगावें । परी माझ्या भक्तांसी न करावें । तूं कधींही सकाम ।।६२।। ऐसें ऐकून गणेशाचें वचन । तैसेंचि मी वागेन । ऐसें त्यासी प्रार्थून । महायशें कामें

वंदिलें तयासी ।।६३।। तेव्हां गणेश स्वस्थाना जात । भक्तिकामुक जो शाश्वत । कामासुरास शांत पाहून परतत । महिषादिक असुर स्वस्थानीं ।।६४।। ते कामासुरास त्यागिती । आपापल्या सदनीं जाती। हा दैत्येंद्र बिघडला म्हणती । लागला भजनीं विकटाच्या ।।६५।।

ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्‌गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते कामासुरशांतिवर्णनं नाम पंचत्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पस्तिसांवा संपूर्ण)